नवनिर्मित कोरची पंचायत समिती (जि.गडचिरोली)
सभापती व गट विकास अधिकारी निवासस्थानाच्या
बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत....

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००८/प्र.क्र.३२२(२)/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २५ जून,२००९.

संदर्भ :- १.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडपीई-१०९७/सीआर ४३६०/२६(पंरा-७) दिनांक १२जून,१९९८
२.कार्यकारी अभियंता (बांध), जि.प.,गडचिरोली यांचे पत्र क्रबांवि/जिपग/पिओ-३/४०२४/ २००८, दि.४.९.२००८
३.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.पंसई २००८/प्र.क्र.३२२/ पंरा-७, दि.२४जून,२००९

प्रस्तावना :-

राज्यात नवनिर्मित २२ पंचायत समित्यांची स्थापना करण्यात आल्यानंतर सदरील पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामासाठी प्रत्येकी रु.१७८.०० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय दिनांक-१२जून,१९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये नवनिर्मित कोरची पंचायत समितीचा समावेश होता. कोरची पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाकरीता रु.१७८.०० लक्ष किंमतीचे अंदाजपत्रकास वारंवार होणाऱ्या दरवाढीमुळे वेळीच तांत्रिक मान्यता न मिळणे, सदर बांधकामाची किंमत रु.५०.०० लक्ष पेक्षा जास्त असल्याने निविदा स्विकृतीचे ठराव जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेत कायम होण्यास होणारा विलंब व त्या दरम्यान झालेल्या दरवाढीमुळे संबंधित कंत्राटदाराकडून काम करण्यास देण्यात येणार नकार यामुळे प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यास विलंब झाल्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गडचिरोली यांनी दिनांक-१३.१.२००९ च्या पत्रान्वये स्पष्ट केले आहे. दरम्यान, कोरची पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाकरिता सन १९९९ ते २००८ अखेर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु.१०२.०० लक्ष निधीतून दोन गोदामाची बांधकामे, अंतर्गत रस्ते व संरक्षक भिंत यावर रु.५८.०३ लक्ष खर्च करण्यात आला आहे.

२. नवनिर्मित कोरची पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेस दहा वर्षाचा कालावधी झालेला असल्याने, सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील प्रकरण-३, (ड) (३) नियम-२६२ तरतूद विचारात घेता, सन १९९८ मधील मूळ प्रशासकीय मान्यतेतील उर्वरीत कामे मंजूर प्रमा किंमतीत हाती घेणे शक्य नसल्याने, आतापर्यंत झालेली दोन गोदामाची बांधकामे, अंतर्गत रस्ते व संरक्षक भिंत इ.एकूण रु.५८.०३ लक्ष किंमतीची कामे वगळून, सदरील प्रशासकीय मान्यता रद्द करण्याचा निर्णय समक्रमांकाच्या दिनांक २४ जून,२००९ च्या शासन निर्णन्वये घेण्यात आला.

३. आता, कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प.,गडचिरोली यांनी संदर्भीय पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या भाग-१ मधील नवनिर्मित कोरची पंचायत समितीच्या सभापती व गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या एकूण रु.२८,२०,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

४. नवनिर्मित कोरची पंचायत समितीच्या सभापती व गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या रु.२८,२०,०००/-(अक्षरी रुपये अठ्ठावीस लक्ष वीस हजार फक्त) एवढ्या अंदाजपत्रकीय किंमतीची बांधकामास पुढील अटी-शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

(१). कोरची पंचायत समितीच्या सभापती व गट विकास अधिकारी निवासस्थानाच्या बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
(२). प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(३). या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४). प्रस्तुत सभापती व गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

५. नवनिर्मित कोरची पंचायत समितीच्या सभापती व गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| **Sr.** | **Work Details** | **Amount (in Rs)** |
| 1 | Resi. Qurt.Type III for Block Dev.Officer | 759144.00 |
| 2 | Resi. Qurt.Type IV for Chairman of Panchayat Samiti | 1251488.00 |
| 3 | Total Cost of Civil Work | 2010632.00 |
| 4 | Add 10 % external water supply and sanitary arrangement | 201063.32 |
| 5 | Add 11% internal Electrification. | 221169.52 |
| 6 | Add 5% Contingencies | 100531.60 |
| 7 | Add 1% W.C.Establishment | 20106.32 |
| 8 | Add 0.5% for Qality control charges | 10053.16 |
| 9 | Total | 2563555.80 |
| 10 | Add 10% for Tribal Area | 256355.58 |
| 11 | Total Estimated cost Rs. | 2819911.38 |
| 12 | Say | Rs.28,20,000/- |

५. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

६. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ १२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०६२४११५६०६०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.

२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गडचिरोली
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गडचिरोली
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गडचिरोली
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गडचिरोली
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, गडचिरोली
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गडचिरोली
१०) सभापती, पंचायत समिती, कोरची, जिल्हा गडचिरोली
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, **कोरची**, जिल्हा गडचिरोली
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४)का.क्र. वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई